जकात कर रद्द करणे आणि त्याऐवजी पर्यायी महसुलाचे साधन शोधून काढणे या प्रयोजनाकरिता नियुक्त केलेल्या समितीला अहवाल सादर करण्यास मुदत वाढ देण्याबाबत...

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक-संकीर्ण-१०९१/प्र.क्र. ३४/कराधान-१.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- ६ एप्रिल १९९४.

वाचा:- १] शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१०९१/ प्र.क्र. ३४/कराधान-१, दिनांक ७.६.१९९३.
२] शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१०९१/ प्र.क्र. ३४/कराधान-१, दिनांक ४ सप्टेंबर, १९९३.
३] शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१०९१/ प्र.क्र. ३४/कराधान-१, दिनांक २२ नोव्हेंबर १९९३.

प्रस्तावना:- जकात कर रद्द करून त्याऐवजी महसुलाचे पर्यायी साधन शोधून काढण्यासाठी शासनाने नियुक्त केलेल्या समितीला त्यांचा अहवाल सादर करण्यासाठी दिनांक ३१ मार्च १९९४ पर्यंत मुदतवाढ मंजूर करण्यात आलेली होती. तथापि समितीचे अध्यक्ष हे राज्याचा १९९४-९५ चा अर्थसंकल्प आणि तदसंबंधीचे वित्तमंत्र्याचे अर्थसंकल्पिय भाषण तयार करण्याच्या व इतर अनुषंगिक कामकाजामध्ये कार्यरत राहिल्यामुळे समितीची पुढील बैठक घेऊन दिनांक ३१ मार्च, १९९४ पर्यंत अहवाल सादर करणे शक्य झाले नाही. म्हणून समितीला अहवाल सादर करण्यासाठी आणखी मुदतवाढ देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय:- राज्य शासनाने नियुक्त केलेल्या प्रधान सचिव, [वित्त] यांच्या अध्यक्षतेखालील जकात कर विषयक समितीला अहवाल सादर करण्यासाठी आणखी तीन महिन्यांची म्हणजे दिनांक ३० जून १९९४ पर्यंतची मुदतवाढ मंजूर करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

[ वि.प्र. कुलकर्णी ]
अवर सचिव, वित्त विभाग.

...२

प्रत माहितीसाठी सादर अग्रेषित:-

१] समितीचे सर्व सदस्य,

२] मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव.

३] मा. वित्तमंत्री/वित्त राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक.

४] सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

५] सचिव [परिवहन], गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

६] सचिव [ग्राम विकास] ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

७] विक्रीकर आयुक्त, विक्रीकर भवन, ८ वा मजला, माझगांव, मुंबई-४०० ०१०.

८] महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

९] महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई.

१०] महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर.

११] निवड नस्ती, कराधान-१.